महाराष्ट्र शासन

अति तात्काळ.

पत्र क्रमांक सीबीसी 2007/प्र.क्र.250/मावक-5,
सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,
मंत्रालय, मुंबई : 400 032.
दिनांक : 22 नोव्हेंबर 2011

प्रति,

सर्व जिल्हाधिकारी,

विषय :- महाराष्ट्र राज्यातील स्थानिक स्वराज्य संस्थांच्या राखीव प्रभागामधून निवडणूक लढवू इच्छिणा-या मागासवर्गीय उमेदवारांना जाती दावा पडताळणी करण्याबाबत----

संदर्भ :- शासन पत्र समक्रमांक दिनांक 19नोव्हेंबर 2011

उपरोक्त विषयावरील संदर्भाधीन पत्रान्वये दिलेल्या सूचना या पत्रान्वये रद्द करण्यात येत असून सुधारित सूचना खालीलप्रमाणे देण्यात येत आहेत..

2. राज्यातील माहे जानेवारी 2012 ते मार्च, 2012 या कालावधीत स्थानिक स्वराज्य संस्थांच्या उदा. महानगरपालिका, जिल्हापरिषदा इत्यादीमधील निवडणुकीकरिता राखीव प्रवर्गामधून निवडणूक लढवू इच्छिणा-या अनुसूचित जाती, विमुक्त जाती व भटक्या जमाती, इतर मागासवर्ग तसेच विशेष मागास प्रवर्गातील मागासवर्गीय उमेदवारांच्या जाती पडताळणीचे प्रस्ताव विहित नमुन्यात आवश्यक त्या कागदपत्रांसह दिनांक 21 नोव्हेबर 2011 पर्यंत स्वीकारण्याच्या सूचना संदर्भाधीन पत्राव्दारे देण्यात आलेल्या आहेत.

2. मुंबई ग्रामपंचायत अधिनियम 1958 मध्ये सुधारणा करण्यासाठी पारीत केलेला अध्यादेश दिनांक 8 जून 2011 अन्वये नामनिर्देशनासोबत वैधता प्रमाणपत्र देण्यासाठी पडताळणी समितीकडे सादर केलेल्या अर्जाची सत्य प्रत किंवा पडताळणी समितीकडे तिने असा अर्ज केला असल्याबद्दलचा अन्य कोणताही पुरावा आणि ती निवडून आल्याचे घोषित झाल्याच्या दिनांकापासून चार महिन्यांच्या मुदतीत पडताळणी समितीने दिलेले वैधता प्रमाणपत्र ती सादर करील याबद्दलचे हमीपत्र आणि त्या व्यक्तीने निवडून आल्याचे घोषित झाल्याच्या दिनांकापासून चार महिन्यांच्या मुदतीत वैधता प्रमाणपत्र सादर करण्यास कसूर केल्यास तिची निवड पूर्वलक्षी प्रभावाने रद्द झाल्याचे मानण्यात येईल व ती सदस्य राहण्यास निरर्ह ठरेल अशी तरतूद करण्यात आलेली आहे. मात्र महानगरपालिका, नगरपालिका तसेच जिल्हा परिषदांच्या निवडणुकांसाठी अशा प्रकारची तरतूद केलेली नाही आणि अशा निवडणुकांसाठी नामनिर्देशनासोबतच वैधता प्रमाणपत्र सादर करणे अनिवार्य केलेले आहे. सध्या मोठया प्रमाणात जाती वैधता प्रमाणपत्रासाठी जिल्हाधिका-यांच्या अध्यक्षतेखालील समित्यांकडे अर्ज आलेले आहेत आणि नगर परिषदांच्या निवडणुकीसंदर्भात नामनिर्देशन पत्रे स्वीकारण्याची कार्यवाही सुरु झालेली आहे. यास्तव,

जिल्हाधिकारी यांना कळविण्यात येत आहे की, त्यांचेकडे प्रलंबित असलेले सर्व जाती दावे युध्दपातळीवर निकाली काढून कोणत्याही परिस्थितीत त्यांना नामनिर्देशन पत्र दाखल करण्याच्या दिनांकापर्यंत वैधता प्रमाणपत्र देण्याची कार्यवाही पूर्ण करावी. यासाठी त्यांनी आवश्यक ते मनुष्यबळ समाजकल्याण विभाग, महसूल विभाग व अन्य विभागांकडून उपलब्ध करुन घ्यावे. तसेच संशस्यास्पद प्रकरणामध्ये गृह चौकशी किंवा अन्य चौकशी करणे आवश्यक असल्यास अशा प्रकरणांमध्ये तलाठी, ग्रामसेवक व पोलीस पाटील यांची मदत घेऊन युध्दपातळीवर अशी चौकशी विहित मुदतीत पूर्ण करावी.

( रत्नाकर गायकवाड )
मुख्य सचिव

प्रत: -

आयुक्त, राज्य निवडणूक आयोग, महाराष्ट्र राज्य, मुंबई
सर्व विभागीय आयुक्त,
संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य,
सर्व सदस्य सचिव, जिल्हा जात प्रमाणपत्र पडताळणी समित्या/विभागीय जाती प्रमाणपत्र पडताळणी समित्या,